(२६३)

20150423151830102७

कोल्हार को.प.बंधारा ता.राहता,
जि.अहमदनगर व्दितीय सुधारित
प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- कोपबं २००९/(२९९/२००९) ग्वारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १९/०३/२०१०

पहावे :- १) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक गोमपाविम कोल्हार कोपबं सुप्रमा/तां-५/५८७० दिनांक २३/०६/२००९.

प्रस्तावना :-

कोल्हार कोल्हापूर पध्दतीचा बंधारा ता.राहता, जि.अहमदनगर या योजनेस शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२००४/९३९/(९३५/२००४) ग्वारभूमी दि.७/०४/२००५ अन्वये रू.६३९.२५ लक्ष रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तसेच मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांनी तांत्रिक मान्यता दिनांक ७/०४/२००५ अन्वये रुपये ५५६.७३ लक्ष किंमतीस प्राप्त झाली आहे. सदर या योजनेचे काम चालु असताना पायामधील तांत्रिक अडचणी तसेच डॉयफ्रेम वॉलचे सिमेंट बेन्टोनाईट जोडविषयी संदिग्धता असल्याने सुधारित पाईल फाऊंडेशन व आर.सी.सी. डायफ्रेम वॉलचे बांधकाम अंतिम करण्यात आले. तसेच दरम्यानच्या काळात दरसूचीतील फरक, भूसंपादनाच्या किंमतीत झालेली वाढ जास्त दराने निविदा स्विकारल्याने वाढ, संकल्पचित्रात बदल इत्यादी कारणांमुळे झालेली वाढ विचारात घेऊन कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांच्याकडून रू.१०९४.४१ लक्ष किंमतीचा व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव शासनास प्राप्त झाला व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

आता या शासन निर्णयान्वये कोल्हार कोल्हापूर पध्दतीचा बंधारा, ता.राहता, जि.अहमदनगर या योजनेस सन २००८-२००९ वर्षाच्या दरसुचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रुपये १०,९४,४१,७५९/- (रुपये दहा कोटी, चौऱ्याण्णव लक्ष, एकेचाळीस हजार, सातशे एकोणसाठ फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रुपये ९,९४,९८,४२६/- व रुपये ९९,४३,३३३/- अनुषंगिक खर्च या रक्कमेस व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

१) महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार कार्यक्रम (MWSIP) च्या मार्गदर्शक सुचनानुसार काम सुरू करण्यापूर्वी पाणीवापर संस्था (WUA) स्थापन करावी.

२) को.प.बंधाऱ्याच्या परिरक्षण (देखभाल व दुरूस्ती) पाणीवापर संस्था यांनी करावयाची आहे.

३) यापुढे सदर प्रकल्पाच्या किंमतीतील वाढीस परवानगी दिली जाणार नाही.

उपशिर्षवार तरतुदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष "४७०२ लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च ८००-इतर खर्च (१) बांधकामे लघु पाटबंधारे योजना पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" यावर खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय क्रमांक संकिर्ण १०९९/(१२९/९९) मोप्र (प्र) दिनांक १८/५/१९९९ मधील तरतुदीनुसार आतंर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता (१२/२०१०) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(सु. बा. सलाम)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक
आतंर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (लपा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर
कार्यकारी अभियंता, अहमदनगर मध्यम प्रकल्प विभाग, अहमदनगर
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थ शाखा १ /२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, अहमदनगर
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

C:\DOCUME~1\ADMINI~1\MYDOCU~1\patil\suprama gr.doc

शासन निर्णय क्रमांक कोपबं २००८/(२९९/२००९) खारभूमी दिनांक - १९/०३/२०१० चे परिशिष्ट
कोल्हार को. प. बंधारा, ता. राहता, जि. अहमदनगर अंदाजपत्रकाचा गोषवारा

| क्रमांक | उपशिर्ष | शिर्ष कामे | एकुण रुपयात |
|---|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | २८७५४३ | २८७५४३ |
| २ | "ब" (भुसंपादने) | ६५०९९ | ६५०९९ |
| ३ | "सी" मुख्य कामे | ९७३१३८७३ | ९७३१३८७३ |
| ४ | "डी" विमोचक | -- | -- |
| ५ | "ई" फॉल | -- | -- |
| ६ | "एफ" आरएचटी वर्क्स | -- | -- |
| ७ | "जी" पूल (सीटी क्रॉसींग) | -- | -- |
| ८ | "एच" एस्कोप | -- | -- |
| ९ | "के" इमारती | ५००००० | ५००००० |
| १० | "एल" मातीकाम | -- | -- |
| ११ | "एम" वृक्षारोपन | -- | -- |
| १२ | "ओ" संकिर्ण | ७७०२६० | ७७०२६० |
| १३ | "पी" देखभाल | २५३२८५ | २५३२८५ |
| १४ | "आर" दळणवळण | ३०८३६६ | ३०८३६६ |
| १५ | वितरिका | -- | -- |
| | कामाप्रित्यर्थ किमत | ९९४९८४२६ | ९९४९८४२६ |
| | अनुषंगिक खर्च (१० टक्के भूसंपादन खर्च वगळून) | | ९९४३३३३ |
| | योजनेची एकूण किंमत | | १०९४४१७५९ |

## ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | ५९८ हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | १६३२.३६ स.घ.मी. |
| पाणीसाठयाची प्र.स.घ.मी. किंमत (रु) | ६७०४५.११ > १४५७३ (आर्थिक मापदंडात बसत नाही) |
| लाभव्यय गुणोत्तर | १.२८ > १.०० (आर्थिक मापदंडात बसते.) |